गाव नमुना ७/१२ व ८अ वर नवीन
ई-महाभूमिचा लोगो वापरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१५/ प्र.क्र. २८४ /ल-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख : २८ फेब्रुवारी, २०२०

**संदर्भ:-** जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे यांचेकडील
दि. ०५/०६/२०१५ चा प्रस्ताव

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम राज्यात “ई-महाभूमि” या नावाने राबविण्यात येत असून या कार्यक्रमांतर्गत ई-फेरफार हा प्रकल्प राबविण्यात येत आहे. यामध्ये भूमि अभिलेख विभाग, महसूल विभाग आणि नोंदणी विभाग यांचे फेरफार विषयक कामकाज आज्ञावलीव्दारे एकमेकांशी संलग्न केले जाणार आहे.

राज्यामध्ये ऑनलाईन फेरफाराची अंमलबजावणी सुरू झालेल्या तालुक्यांमधील अधिकार अभिलेख (गा.न.नं. ७/१२ व ८अ) नागरीकांना दिसण्यासाठी नवीन अद्यावत संकेतस्थळ विकसित करण्यात आलेले आहे. ई-फेरफार प्रकल्पाचे अंमलबजावणीमध्ये जिल्हयातील तालुकानिहाय गा.न.नं. ७/१२ चा डाटा स्टेट डेटा सेंटरवर स्थापित करण्याचे काम सुरू असून तदनंतर तो डेटा ऑनलाईन अद्ययावत होणार आहे. त्यामुळे तालुक्यांतील नागरीकांच्या मागणीनुसार अधिकार अभिलेखाच्या नकला सेतू केंद्रातून तसेच तलाठ्याकडील लॅपटॉपव्दारे उपलब्ध करून दिल्या जाणार आहेत. सदर संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ व ८अ (अधिकार अभिलेख) वर वापरण्याकरीता महाराष्ट्र शासनाचा लोगो (Water mark) राष्ट्रीय सुचना विज्ञान केंद्र, पुणे यांनी तयार केला आहे. ऑनलाईन फेरफार सुरू झालेल्या तालुक्यांचे वेबसाईटवरून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ व ८अ च्या नकला वितरीत करताना महाराष्ट्र शासनाचा लोगो (Water Mark) चे चिन्ह वापरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

राज्यातील ई-फेरफार ह्या प्रकल्पातंर्गत राज्यातील सध्या ऑनलाईन ई- फेरफार सुरू झालेल्या तालुक्यांतील जनतेला तलाठ्याकडील लॅपटॉपव्दारे, सेतू केंद्रातून पुरविण्यांत येणाऱ्या संगणीकृत गा.न.नं. ७/१२ व ८अ च्या नकलांवर राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांनी तयार केलेला महाराष्ट्र शासनाचा लोगो (Water mark) कागदाच्या वरच्या बाजूस मध्यभागी व ई- महाभूमी प्रकल्पाचा लोगो (Water mark) मध्यभागी वापरण्यास शासन याव्दारे परवानगी देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२२८१५३९०५४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh
Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.02.28 15:41:02 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
६. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव
७. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
८. सर्व विभागीय आयुक्त
९. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१३. कोषागार अधिकारी, पुणे
१४. माहिती जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
१५. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग, का. क्र.१४७५, मंत्रालय, मुंबई
१७. वित्त विभाग,कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई.